**विदर्भातील शेतक-यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त असलेल्या ६ जिल्हयांमध्ये इंटरनॅशनल फंड फॉर अग्रीकल्चरल डेव्हलपमेंट सहाय्याने राबविण्यात येणा-या 'समन्वयीत कृषि विकास प्रकल्पाकरिता (C-AIM)' विविध समित्यांचे गठन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,

शासन शुध्दीपत्रक क्रमांक बासप्र २००८/प्र.क्र.४८/२१-स,

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : १५ जून, २०१०.

**वाचा** : १. शासन निर्णय क्र. बासप्र २००८/प्र.क्र.४८/२१-स, दिनांक १३.०८.२००९.

२. शासन निर्णय क्रमांक बासप्र २००८/प्र.क्र.४८/२१-स, दिनांक ०७.१०.२००९.

**शुध्दीपत्रक :**

युनोच्या इंटरनॅशनल फंड फॉर ॲग्रीकल्चरल डेव्हलपमेंट (IFAD) या संस्थेच्या सहकार्याने विदर्भातील शेतक-यांच्या आत्महत्यांनी ग्रस्त असलेल्या अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा व यवतमाळ या ६ जिल्हयांमध्ये पुढील ८ वर्ष कालावधीकरिता 'समन्वयीत कृषि विकास प्रकल्प (C-AIM)' राबविण्याबाबत अनु. क्र. १ येथील संदर्भाकिंत शासन निर्णयान्वये निर्णय राज्य शासनाने घेतला होता त्यानुषंगाने प्रकल्पाच्या राज्य स्तरावरील तसेच विभागीय व जिल्हा स्तरावर योग्य समन्वयाकरिता तसेच शासनाच्या वेगवेगळया विभागामार्फत कृषिशी निगडीत राबविण्यात येणा-या विविध योजनांमध्ये योग्य समन्वय साधण्याकरिता अनु.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विविध समित्यांचे गठन करण्यात आलेले आहे. सदर समित्यांमध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

**अ. राज्यस्तरीय प्रकल्प सुकाणू समिती (SPSC):**

राज्यस्तरावरुन समन्वयीत कृषि विकास प्रकल्पाचे समन्वय करण्याकरिता मुंबई येथे मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प सुकाणू समितीमध्ये खालील विभागांच्या सचिवांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात येत आहे.

१. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग - सदस्य

२. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग - सदस्य

त्याचप्रमाणे या प्रकल्पाच्या 'राज्य संपर्क अधिका-यांऐवजी' 'प्रकल्प संचालक, समन्वयीत कृषि विकास प्रकल्प(C-AIM)' हे सदर राज्य स्तरीय समितीचे 'सदस्य-सचिव' राहतील.

**ब. विभागीय प्रकल्प सुकाणू समिती (PSC):**

समन्वयीत कृषि विकास प्रकल्पाचे विभागीय स्तरावर समन्वय व अंमलबजावणी करण्याकरिता अमरावती येथे विभागीय आयुक्त अमरावती व नागपूर यांच्या संयुक्त अध्यक्षतेखाली 'प्रकल्प सुकाणू

समितीचे' गठन करण्यात आले असून सदर समितीमध्ये 'अतिरिक्त आदिवासी विकास आयुक्त' यांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात येत आहे.

**क. जिल्हास्तरीय प्रकल्प समन्वय समिती (DPCC):**

प्रत्येक जिल्हयाच्या मुख्यालयी जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखाली सध्याच्या 'आत्मा(ATMA)' अंतर्गत 'जिल्हास्तरीय प्रकल्प समन्वय समितीचे' गठन करण्यात आले असून सदर समिती आपल्या जिल्हयांतर्गत कार्यरत असणा-या प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास यांना सदस्य म्हणून निमंत्रित करु शकेल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा क्रमांक २०१००६२३१३४४०५००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
(श्रीकांत चं. आंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. मंत्री (वित्त व नियोजन), यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मंत्री (पणन) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (कृषी व जलसंधारण) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा. मंत्री (पदुम) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२
८. मा. मंत्री (महिला व बालकल्याण) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२
९. मा. राज्यमंत्री (पणन) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११. प्रधान सचिव (पणन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१२. प्रधान सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई-३२.
१३. प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-३२.
१४. प्रधान सचिव (कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
१५. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, मुंबई-३२
१६. प्रधान सचिव (जलसंधारण), मंत्रालय, मुंबई-३२
१७. सचिव (ग्रामविकास), मंत्रालय, मुंबई-३२
१८. सचिव (महिला व बालविकास), मंत्रालय, मुंबई-३२
१९. कृषि आयुक्त, सेंट्रल बिल्डींग, पुणे-१
२०. पशुसंवर्धन आयुक्त, पुणे.

२१. आयुक्त, दुग्धविकास, वरळी, मुंबई
२२. महिला व बालविकास आयुक्त, पुणे.
२३. विभागीय महसूल आयुक्त, अमरावती.
२४. विभागीय महसूल आयुक्त,नागपूर
२५.श्री. एन.नवीन सोना, अति. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग व प्र. प्रकल्प संचालक, C-AIM.
२६. पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ प्रती)
२७. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे (३ प्रती)
२८.व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, म्हाडा इमारत, बांद्रा, मुंबई-५१.
२९. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
३०. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, नागपूर
३१. निवासी लेखापरिक्षण अधिकारी, मुंबई
३२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
३३. जिल्हाधिकारी, (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
३४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
३५. विभागीय कृषी सहसंचालक, अमरावती.
३६. विभागीय कृषी सहसंचालक,,नागपूर.
३७. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, अमरावती.
३८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था,,नागपूर.
३९. प्रादेशिक सह आयुक्त, पशुसंवर्धन (अमरावती, नागपूर)
४०. प्रादेशिक दुग्ध व्यवसाय विकास अधिकारी (अमरावती, नागपूर)
४१. प्रादेशिक संचालक, मत्स्य व्यवसाय (अमरावती, नागपूर)
४२. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४३. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४४. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त / जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४५. जिल्हा दुग्ध विकास अधिकारी (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४६. जिल्हा मत्स्य व्यवसाय विकास अधिकारी (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४७. जिल्हा कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४८.जिल्हा लेखा व कोषागार अधिकारी, (अमरावती, अकोला, वाशिम, वर्धा, बुलढाणा, यवतमाळ)
४९. महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, इंडस्ट्री अँण्ड ॲग्रिकल्चर, ओरिकॉन हाऊस, ६ वा मजला, १२, के. दुभाष मार्ग, फोर्ट, मुंबई.
५०. निवड नस्ती